स्थानिक स्वराज्य संस्था (महानगरपालिका/ नगरपरिषद/जिल्हा परिषद, पोलिस वेल्फेअर, आर्मी वेल्फेअर) यांनी नवीन शाळा सुरु करण्यासंदर्भात....

आर्मी वेलफेअर एज्युकेशन सोसायटी, के/ऑफ कॅड, कॅम्प, पुलगाव संचलित आर्मी प्रायमरी स्कूल, पुलगाव, कॅड कॅम्प, पुलगाव, देवळी, जि. वर्धा या शाळेस स्वंयअर्थसहाय्यित तत्वावर दर्जावाढ करण्यास मान्यता देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रिडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएफएस-१०२४/प्र.क्र.१२०/एसएम- २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १६ जूलै, २०२४.

वाचा -

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: नमाशा-२००९/(४९७/०९)/ माशि-१, दिनांक ११ जून, २००९.
२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. शिसं/स्वयंअर्थ/२०२४-२५/एस-४/३४६२, दि.२८.०६.२०२४.

प्रस्तावना :-

आर्मी वेलफेअर एज्युकेशन सोसायटी, के/ऑफ कॅड, कॅम्प, पुलगाव संचलित आर्मी प्रायमरी स्कूल, पुलगाव, कॅड कॅम्प, पुलगाव, देवळी, जि. वर्धा या शाळेस स्वंयअर्थसहाय्यित तत्वावर शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून स्वंयअर्थसहाय्यित तत्वावर दर्जावाढ मिळणेबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. (२) अन्वये शासनास प्राप्त झाला होता. सदर शाळेस स्वंयअर्थसहाय्यित तत्वावर दर्जावाढ परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ (सन २०१३ चा ०१) अंतर्गत आर्मी वेलफेअर एज्युकेशन सोसायटी, के/ऑफ कॅड, कॅम्प, पुलगाव संचलित आर्मी प्रायमरी स्कूल, पुलगाव, कॅड कॅम्प, पुलगाव, देवळी, जि. वर्धा या शाळेस प्राथमिक शाळेला जोडून उच्च प्राथमिक, इ. ६ वी ते इ. ८ वी स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर दर्जावाढ करण्यास सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षापासून खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन स्तरावरुन परवानगी देण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | शाळेचे नाव व पत्ता | माध्यम | मंडळ | शाळेचा प्रकार |
|---|---|---|---|---|
| १ | आर्मी वेलफेअर एज्युकेशन सोसायटी, के/ऑफ कॅड, कॅम्प, पुलगाव संचलित आर्मी प्रायमरी स्कूल, पुलगाव, कॅड कॅम्प, पुलगाव, देवळी, जि. वर्धा. | इंग्रजी | सी.बी.एस.ई | दर्जावाढ, प्राथमिक शाळेस जोडून उच्च प्राथमिक (इ. ६ वी ते इ. ८ वी) |

**अटी व शर्ती :-**

I. सदर प्राथमिक शाळेस आवश्यक व यापुढे येणाऱ्या कोणत्याही खर्चाकरिता, राज्य शासनाकडून प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष असे कोणतेही वित्तीय सहाय्य / अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

II. प्राथमिक शाळांबाबतचे शासनाचे प्रचलित धोरण व निकष यांचे पालन करणे तसेच शाळेमध्ये आवश्यक वर्गखोल्या, सर्व भौतिक व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देणे अनिवार्य राहील.

III. महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ अन्वये निर्धारित केलेल्या सर्व मानकांचे, अटींचे व शर्तीचे आणि या अधिनियमांन्वये शासनाने दिलेल्या निदेशांचे किंवा शासनाने वेळोवेळी विनिर्दिष्ट केलेल्या मानकांचे किंवा अटीं व शर्तीचे पालन करणे अनिवार्य राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१६१२४१५६२४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2024.07.16 12:53:30 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर.
५. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद, वर्धा.
६. निवडनस्ती (१२०/२०२४/एसएम-२).